**नागपूर महसूल विभागातील ४ क्षेत्रिय अधिकाऱ्यांना जुन्या निर्लेखित वाहनांच्या बदली नवीन वाहने खरेदी करण्यास मंजुरी देणेबाबत....**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**

शासन निर्णय क्रमांकः जेपीएस-२०१६/प्र.क्र.१७३/ई-८
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक: १९ जून, २०१७.

**संदर्भ:-**

१) विभागीय आयुक्त, नागपूर विभाग, नागपूर यांच्या कार्यालयाचे पत्र
क्र. साप्रशा/कार्या सी(१०)/कावि १३७/१६, दि. ०३/०५/२०१६
क्र. साप्रशा/कार्या सी(१०)/कावि ३०२/१६, दि. २१/०९/२०१६
क्र. साप्रशा/कार्या सी(१०)/कावि ३३९/१६, दि. ०५/१०/२०१६
क्र. साप्रशा/कार्या सी(१०)/कावि ३९६/१६, दि. १७/११/२०१६

२) जिल्हाधिकारी, चंद्रपूर यांच्या कार्यालयाचे पत्र
क्र. मशा/कार्या-२/लेखा टे.३/२०१६/५५३, दि. २५/०५/२०१६

३) जिल्हाधिकारी, भंडारा यांच्या कार्यालयाचे पत्र
जा.क्र. कार्या-९/लेखा-५/कावि/४५९/१६, दि. २५/०८/२०१६

४) शासन निर्णय, महसूल व वन विभाग, क्र. जेपीएस-२०१३/प्र. क्र. ३१४/ई-८, दि. २१ एप्रिल, २०१६.

५) शासन निर्णय, वित्त विभाग क्रमांक-वाहन-२०१६/प्र.क्र.५१/१६/विनियम, दि. २१/०१/२०१७.

**प्रस्तावना:-**

नागपूर महसूली विभागातील लेखाशिर्ष “२०५३-जिल्हा प्रशासन" या खाली वेतन आहरीत करणा-या एकूण ४ क्षेत्रिय अधिका-यांना शासकीय वाहनांची अनुज्ञेयता संदर्भ क्र. ४ च्या शासन निर्णय दि.२१ एप्रिल, २०१६ अन्वये मंजूर केली आहे. विभागीय आयुक्त, नागपूर विभाग, नागपूर व जिल्हाधिकारी, चंद्रपूर व भंडारा यांच्या वरील संदर्भ क्र. २ व ३ च्या पत्रान्वये पुढील क्षेत्रिय अधिका-यांना तक्त्यात दर्शविलेल्या निर्लेखित केलेल्या वाहनांच्या बदली नवीन वाहने खरेदी करण्याचे प्रस्ताव शासनास सादर केले आहेत.

| अ.क्र. | वाहन वापरणाऱ्या अधिकाऱ्याचे पदनाम | निर्लेखित वाहनाचा क्रमांक |
|---|---|---|
| १ | जिल्हाधिकारी, चंद्रपूर | एमएच ३४-८२८६ |
| २ | अपर आयुक्त, नागपूर | एमएच ४०-ई-१ |
| ३ | अपर जिल्हाधिकारी, भंडारा | एमएच ४०-फ-१ |
| ४ | तहसीलदार, चिमुर | एमएच ३४-८१९० |

**शासन निर्णय:-**

नागपूर महसूली विभागातील खालील विवरणपत्रातील नमूद ४ क्षेत्रिय अधिकाऱ्यांना त्यांच्या पूर्वीच्या जुन्या निर्लेखित वाहनांच्या बदली नवीन वाहने खरेदी करण्यास व तदप्रित्यर्थ येणारा खर्च लेखाशिर्ष "मागणी क्रमांक सी-१-२०५३- जिल्हा प्रशासन" मधील विवरणपत्रात दर्शविलेल्या गौण शिर्षाखाली करण्यास शासन मंजुरी देत आहे.-

| अ.क्र. | अधिका-याचे नांव | गौण शिर्ष / बाब क्र. | प्रस्तावित करण्यात आलेल्या वाहनांची संख्या | वाहनाकरिता आवश्यक रक्कम (रु. लाखात) |
|---|---|---|---|---|
| **मागणी क्र. सी-१, २०५३- जिल्हा प्रशासन** | | | | |
| १ | अपर आयुक्त, नागपूर | (००) १०१, आयुक्त (०१)(०५) आयुक्त, नागपूर **(२०५३ ०४६७)** बाब क्र. १३- कार्यालयीन खर्च | १ | ६.०० |
| २ | जिल्हाधिकारी, चंद्रपूर | (००) ०९३ जिल्हा आस्थापना (०१) सर्वसाधारण आस्थापना (०१)(०५) आयुक्त, नागपूर **(२०५३ ०१०८)** बाब क्र. १३- कार्यालयीन खर्च | २ | १३.०० |
| ३ | अपर जिल्हाधिकारी, भंडारा | | | |
| ४ | तहसीलदार, चिमुर | (००) ०९४ इतर आस्थापना (०१) उप विभागीय आस्थापना (०१)(०५) आयुक्त, नागपूर **(२०५३ ०२०६)** बाब क्र. १३- कार्यालयीन खर्च | १ | ६.०० |

२. वरील वाहने खालील अटींच्या अधिन राहून संबंधितांना मंजूर करण्यात येत आहे.-

१) वित्त विभागाच्या संदर्भ क्रमांक ५ येथील दिनांक २१/०१/२०१७ च्या शासन निर्णयान्वये जिल्हाधिका-यांसाठी रु. ७.०० लक्ष व अन्य अधिका-यांसाठी रु. ६.०० लाखांच्या किंमतीच्या

मर्यादेत वाहनांची खरेदी करण्यात यावी. वाहन खरेदीसाठी मंजूर केलेल्या अनुदानामध्ये वाहनाच्या किंमतीमध्ये सर्व करांचा समावेश आहे.

२) नवीन वाहन ज्या अधिकाऱ्यास मंजूर करण्यात आले आहे, त्या अधिकाऱ्यांकडूनच त्याचा वापर त्याच कार्यालयाकरीता, शासकीय कामकाजासाठीच करण्यात यावा. अन्य अधिकाऱ्यांकडे हस्तांतरीत करण्यात येऊ नये.

३) सदर अधिकाऱ्यांची वाहने खरेदी केल्याचा अनुपालन अहवाल वाहन क्रमांकासहित शासनास सादर करावा.

३. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र. १०२/२०१७/व्यय-९, दि.२७/०३/२०१७ व क्र. १३३/विनियम, दि.०७/०४/२०१७ अन्वये दिलेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०१७०६१७१६५१०८२२१९ असा आहे. सदर शासन निर्णय डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

Sambhaji C Mondkar

Digitally signed by Sambhaji C Mondkar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Joint Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=498986dde0d282daba86b0acfc9c21d4f9594cc3a6d64857d6a53c9b86d5509b, cn=Sambhaji C Mondkar
Date: 2017.06.19 11:12:58 +05'30'

(सं. चं. मोंडकर)
सह सचिव, महाराष्ट्र शासन

प्रति,

विभागीय आयुक्त, नागपूर विभाग, नागपूर.
जिल्हाधिकारी, चंद्रपूर.
अपर जिल्हाधिकारी, भंडारा.
तहसिलदार, चिमुर, जिल्हा चंद्रपूर.
प्रधान महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/ लेखा परीक्षा) - २, महाराष्ट्र, नागपूर.
जिल्हा कोषागार अधिकारी, नागपूर/चंद्रपूर/भंडारा.
उप सचिव, वित्त विभाग (कार्यासन व्यय-९ / विनियम), मंत्रालय, मुंबई-३२.
सह सचिव,कार्यासन -ब-१, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
निवड नस्ती, कार्यासन ई-८, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई- ३२.